श्री गजानन प्रसन्न

संध्या पुस्तक

# सार्थ ऋग्वेदी संध्या

लेखक :

प्रवचनकार काशिनाथशास्त्री जोशी

॥ श्रीगणेशाय नमः ॥

संध्या शब्दाचा अर्थ दिवस व रात्र यांच्या संधिकालांत ( म्हणजेच सूर्योदय व सूर्यास्ताच्या वेळीं ) विधिपूर्वक केली जाणारी जी परमेश्वराची आराधना तिला संध्या असें म्हणतात.

त्या संध्येचा अधिकारी उपनयन-संस्कार झालेला पुरुष असतो.

**संध्या कां करावी ?** — ह्याविषयीं परंपरागत आख्यायिका आहे. मंदेह नांवाचे राक्षस सूर्याबरोबर युद्ध करीत असतात. त्यांचा निरास व्हावा म्हणून पूर्वेकडे मुख करून सूर्योदयाच्या व सूर्यास्ताच्या वेळीं गायत्रीमंत्रानें अभिमंत्रित अशीं तीन अर्घ्यें द्यावींत. त्यामुळें अर्घ्यांतील जल राक्षसांचा नाश करतें व उदय-अस्ताच्या वेळीं सूर्याला होणारा प्रतिबंध नाहींसा होतो; म्हणून संध्या करावी.

**संध्येंतील महत्त्वाचीं कर्मैं :**— ( १ ) अर्घ्यदान, गायत्रीजप व सूर्योपस्थान हीं तीन कर्में मुख्य आहेत.

आचमन, मार्जन, मंत्राचमन, अघमर्षण इत्यादि कर्में गौण आहेत.

**संध्योपासनेचें साहित्य :—** पाट, तांब्या, पळी, पंचपात्री, ताम्हन, भस्म, सोवळें. संध्येला बसण्यासाठीं पाटापेक्षां दर्भासन किंवा कृष्णाजिन (हरिणाचें कातडें) मिळाल्यास अधिक श्रेष्ठ आहे.

स्नान केल्याशिवाय संध्या करण्याचा अधिकार नाहीं, त्याचप्रमाणें ज्याच्या गळ्यांत यज्ञोपवीत (जानवें) नाहीं त्यालाहि संध्यावंदनाचा अधिकार नाहीं.

॥ श्रीः ॥

## संध्येस कोणीकडे तोंड करून बसावें ?

नेहमींच पूर्वेस तोंड करून बसावें. एखाद्या वेळीं उत्तरेकडे मुख केलें तरी चालेल. सायंकाळचीं संध्येचीं अर्घ्यें पश्चिमेकडे मुख करून द्यावीं. संध्येला बसतेवेळीं कृष्णाजिन, दर्भासन, पांढरें लोकरीचें आसन किंवा पाट यावर बसावें.

卐 卐 卐

## ॥ अथ भस्मधारणविधिः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ अथ भस्मधारणविधिः ॥ आचम्य प्राणायामं च कृत्वा ॥ अद्येत्यादिपूर्वो॰ शरीरशुद्ध्यर्थं भस्मधारणमहं करिष्ये। ॐ मा नस्तोके तनये मान आयौ मा नो गोषु मा नो अश्वेषु रीरिषः। वीरान्मा नो रुद्र भामितो वधीर्हविष्मंतः सदमित्वा हवामहे ॥ (इति हस्ते भस्म गृहीत्वा जलमिश्रितं कृत्वा) ॐ ॥ ईशानः सर्वविद्यानामीश्वरः सर्वभूतानां ब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोधिपतिर्ब्रह्मा शिवो मे अस्तु सदाशिवोम् ॥ शिरसि ॥ ॐ तत्पुरुषाय विद्महे महादेवाय धीमहि ॥ तन्नोरुद्रः प्रचोदयात् ॥ मुखे ॥ ॐ अघोरेभ्योथ घोरेभ्यो घोरघोरतरेभ्यः ॥ सर्वेभ्यः सर्व-शर्वेभ्यो नमस्ते अस्तु रुद्ररूपेभ्यः ॥ हृदये ॥ ॐ वामदेवाय नमो ज्येष्ठाय नमः श्रेष्ठाय नमो रुद्राय नमः कालाय नमः कलविकरणाय नमो बलविकरणाय नमो बलाय नमो बलप्रमथनाय नमः सर्वभूतदमनाय नमो मनोन्मनाय नमः ॥ गुह्ये ॥ ॐ सद्यो जातं प्रपद्यामि सद्यो जाताय वै नमो नमः ॥ भवे भवेनातिभवेभवस्व मां भवोद्भवाय नमः ॥

पादयोः ॥ ॐ अग्निरिति भस्म । वायुरिति भस्म । जलमिति भस्म । स्थलमिति भस्म । व्योमेति भस्म । सर्वं ह वा इदं भस्म । मन एतानि चक्षूंषि भस्मानि ॥ तच्च ॐ नमः शिवाय इति त्रिवारोच्चारितेन सर्वाङ्गे विलिप्य आचामेत् ॥

कृति—डाव्या हातावर भस्म कालवून उजव्या हाताची करंगुळी सोडून तीन बोटांनी मस्तकाला व दोन्ही हातांच्या तीनही सांध्यांवर भस्म लावावें. वरील मोठा मंत्र येत नसल्यास ॐ नमः शिवाय या मंत्रानें भस्म लावावें.

नंतर डाव्या हातांत पळी घेऊन उजव्या हातावर पाणी घ्यावें व पुढील चोवीस नांवांपैकीं पहिल्या तीन नांवांनी पाणी प्यावें व चौथ्या नांवानें उजव्या हातावरून पाणी ताम्हनांत सोडावें.

आचमनम्—ॐ केशवाय नमः । ॐ नारायणाय नमः । ॐ माधवाय नमः । ॐ गोविंदाय नमः । ॐ विष्णवे नमः । ॐ मधुसूदनाय नमः । ॐ त्रिविक्रमाय नमः । ॐ वामनाय नमः । ॐ श्रीधराय नमः । ॐ हृषीकेशाय नमः । ॐ पद्मनाभाय नमः । ॐ दामोदराय नमः । ॐ संकर्षणाय नमः । ॐ वासुदेवाय नमः । ॐ प्रद्युम्नाय नमः । ॐ अनिरुद्धाय नमः । ॐ पुरुषोत्तमाय नमः । ॐ अधोक्षजाय नमः ।

ॐ नारसिंहाय नमः । ॐ अच्युताय नमः । ॐ जनार्दनाय नमः । ॐ उपेंद्राय नमः । ॐ हरये नमः । ॐ श्रीकृष्णाय नमः ॥

प्राणायामः—ॐ प्रणवस्य परब्रह्म ऋषिः । परमात्मा देवता । दैवी गायत्री छन्दः । सप्तानां व्याहृतीनां विश्वामित्रजमदग्निभरद्वाजगौतमात्रिवसिष्ठकश्यपा ऋषयः । अग्निवाय्वादित्यबृहस्पतिवरुणेन्द्रविश्वेदेवा देवताः । गायत्र्युष्णिगनुष्टुब्बृहतीपङ्क्तित्रिष्टुब्जगत्यश्छन्दांसि । गायत्र्या विश्वामित्रऋषिः । सविता देवता । गायत्री छन्दः । गायत्रीशिरसः । प्रजापतिर्ऋषिः । ब्रह्माग्निवाय्वादित्या देवताः । यजुश्छन्दः प्राणायामे विनियोगः । ॐ भूः । ॐ भुवः । ॐ स्वः । ॐ महः । ॐ जनः । ॐ तपः । ॐ सत्यं । ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि । धियो यो नः प्रचोदयात् ॥ ( हा गायत्रीमंत्र तीनदां म्हणावा. ) ॐ आपोज्योतीरसोऽमृतं ब्रह्मभूर्भुवःस्वरोम् ॥

**प्राणायाम :**—चोवीस नांवें म्हणून झाल्यानंतर प्राणायाम करावा. प्राणायामाच्या वेळीं ॐ भूः पासून सात व्याहृति, तत्सवितुः पासून प्रचोदयात् पर्यंतचा गायत्रीमंत्र आणि ' आपो-

ज्योती रसोऽमृतं ब्रह्मभूर्भुवः स्वरोम् ' हें गायत्रीचें शिर असे चार मंत्र म्हणावेत. त्याची क्रिया खालीलप्रमाणे :

प्रथम उजव्या हातात अंगठ्यानें उजवी नाकपुडी दाबून डाव्या नाकपुडीनें श्वास वर घ्यावा. याला पूरक असें म्हणतात. नंतर वरील चार मंत्र श्वास न सोडतां तीन वेळां मनांत म्हणून नंतर गायत्रीमंत्र म्हणत उजव्या नाकपुडीनें श्वास सोडावा. कोंडून मंत्र म्हणणें याला कुंभक म्हणतात व श्वास सोडणें या क्रियेला रेचक म्हणतात. एवंच पूरक, कुंभक व रेचक या क्रियांना प्राणायाम असें म्हणतात.

**गायत्रीमंत्राचा अर्थ :—** अखिल विश्वाला उत्पन्न करणारा, जो भगवान् सूर्यनारायण देव त्याच्या सर्वश्रेष्ठ तेजोरूपाचें आम्ही ध्यान करतों, कारण तो सूर्य आमच्या बुद्धीला प्रेरणा देतो.

**संकल्प :—ममोपात्तदुरितक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रातःसंध्यामुपासिष्ये ॥ (वा सायंसंध्यामुपासिष्ये ॥)**

**संकल्प :—** माझ्याकडून घडलेल्या पातकांची निवृत्ति होऊन परमेश्वराची कृपा व्हावी म्हणून मी प्रातःसंध्येची उपासना करतों. (वा सायंसंध्येची उपासना करतों.)

वरील संस्कृत वाक्य उच्चारून उजव्या हातावरून उदक सोडणें यालाच संकल्प असें म्हणतात.

( एक प्रकारें कर्माची प्रतिज्ञा करणें. )

**मार्जनम्—आपोहिष्ठेति तृचस्यांबरीषः सिंधुद्वीप आपोदेवता गायत्री छंदः। मार्जने विनियोगः ॥ ॐ आपो हि ष्ठा मयोभुवः। ॐ ता न ऊर्जे दधातन। ॐ महेरणाय चक्षसे ॥ ( १ ) ॐ यो वः शिवतमो रसः। ॐ तस्य भाजयतेह नः। ॐ उशतीरिवमातरः ॥ ( २ ) ॐ तस्मा अरं गमाम वः। ॐ यस्य क्षयाय जिन्वथ। ॐ आपोजनयथाचनः ॥ ( ३ )**

**मार्जन :**—वरील तीन मंत्र म्हणतेवेळी संध्येच्या पळींत उदक घेऊन दर्भांनीं मस्तकावर व अंगावर पाणी प्रोक्षण करावें. यालाच मार्जन असें म्हणतात.

**वरील मंत्रांचा अर्थ :**—हे उदकांनो, तुम्ही अत्यंत सुखदायक आहांत. आम्हांला बल व तेज द्या ( १ ). ज्याप्रमाणें माता आपल्या मुलांचें रक्षण करण्यासाठीं आपल्या बालकास स्तनपान करवितात त्याप्रमाणें तुम्ही कल्याणकारक रस आम्हांला द्या ( २ ). ज्या रोगांच्या निवृत्तीने आम्हांला आनंद होईल त्यांच्या नाशाकरितां तुमचा स्वीकार करतों. तुम्ही आम्हांला प्रजा उत्पादन करण्यास समर्थ करा ( ३ ).

मंत्राचमनम्—सूर्यश्चेति मंत्रस्य याज्ञवल्क्य उपनिषदः सूर्यमन्युमन्युपतिरात्रयो देवताः । प्रकृतिश्छंदः । मंत्राचमने विनियोगः । ॐ सूर्यश्च मामन्युश्च मन्युपतयश्च मन्युकृतेभ्यः पापेभ्यो रक्षंताम् । यद्रात्र्या पापमकार्षं मनसा वाचा हस्ताभ्यां पद्भ्या- मुदरेण शिश्ना रात्रिस्तदवलुंपतु । यत्किंच दुरितं मयि । इदमहं माममृतयोनौ सूर्ये ज्योतिषि जुहोमि स्वाहा ॥ ॥ केशवायेत्यादि० ॥ २४ ॥

**मंत्राचमन याचा अर्थ :**—उजव्या हातांत पाणी घेऊन वरील मंत्र म्हणावा व नंतर तें पाणी प्यावें. याला मंत्राचमन म्हणतात.

**वरील मंत्राचा अर्थ :**—माझेकडून क्रोधपारतंत्र्यामुळें केलेल्या पातकापासून सूर्य व क्रोध नष्ट करणारा विवेक यांनीं माझें रक्षण करावें. त्याचप्रमाणें मन, वाणी, हात, पाय व जननेंद्रिय आदि इंद्रियांनीं जें पाप रात्रीं केलें असेल त्याचा निरास त्याच रात्रीनें करावा. याशिवाय जें पाप माझ्या ठिकाणीं अवशिष्ट असेल त्या पापाला आणि पापकर्ता जो मी त्या मला अमृताचें उत्पत्तिस्थान अशा सूर्यज्योतींत ( तेजांत ) हवन करतों.

ॐ केशवाय नमः ॐ नारायणाय नमः ॐ माधवाय नमः ॐ गोविन्दाय नमः । पहिल्या तीन नांवांनीं पाणी प्यावें व चवथ्या नांवानें पाणी सोडावें.

द्वितीयमार्जनम्— आपोहिष्ठेति नवर्चस्य सूक्तस्याम्बरीषः सिन्धुद्वीप आपो गायत्री । पञ्चमी वर्धमाना । सप्तमी प्रतिष्ठा । अन्त्ये द्वे अनुष्टुभौ । गायत्रीशिरसः । प्रजापतिर्ऋषिः । ब्रह्माग्निवाय्वादित्या देवताः । यजुश्छंदः । एतेषां मार्जने विनियोगः । ॐ आपो हि ष्ठामयोभुवस्ता न ऊर्जे दधातन । महे रणाय चक्षसे ॥१॥ ॐ यो वः शिवतमोरसस्तस्य भाजयतेह नः । उशतीरिव मातरः ॥ २ ॥ ॐ तस्मा अरं गमाम वो यस्य क्षयाय जिन्वथ । आपो जनयथा च नः ॥३॥ ॐ शं नो देवीरभिष्टय आपो भवन्तु पीतये । शं योरभि स्रवन्तु नः ॥ ४ ॥ ॐ ईशाना वार्याणां क्षयन्तीश्चर्षणीनाम् । अपो याचामि भेषजम् ॥५॥ ॐ अप्सु मे सोमो अब्रवीदंतर्विश्वानि भेषजा । अग्निं च विश्वशंभुवम् ॥६॥ ॐ आपः पृणीत भेषजं वरूथं तन्वे ३ मम । ज्योक्च सूर्यं दृशे ॥ ७ ॥ ॐ इदमापः प्रवहत यत्किंच दुरितं मयि । यद्वाहमभिदुद्रोह यद्वा शेप उतानृतम् ॥ ८ ॥ ॐ आपो अद्यान्वचारिषं रसेन समगस्महि । पयस्वानग्न आगहि तं मा सं सृज वर्चसा ॥ ९ ॥

**दुसरें मार्जन** याचा अर्थ पळी भरून पाणी डाव्या हातांत घ्यावें. उजव्या हातांत दर्भ घेऊन तें पाणी मस्तकावर व अंगावर प्रोक्षण करणें याला मार्जन असें म्हणतात.

हे जलांनो, तुम्ही सुखकारक आहांत म्हणून आत्मज्ञानाकरितां आमचें रक्षण करा. ( १ )

मुलांचें रक्षण करणाऱ्या माता ज्याप्रमाणें शिशूंना स्तनपान करवितात त्याप्रमाणें कल्याणकारक रस तुम्ही आम्हांला द्या. ( २ )

ज्या रोगांची निवृत्ति आम्हांला आनंददायी होईल त्या रोगांच्या नाशासाठीं, हे उदकांनो, आम्ही तुमचा स्वीकार करतों. आम्हांस तुम्ही प्रजा करण्यास समर्थ करा. ( ३ )

उदक आमच्या पापाचा नाश करून आम्हांस आनंद देवोत व पिण्यासही मिळो. अवृष्टि व विविध रोग यांचा निरास करणारे उदकप्रवाह आम्हांला पवित्र करो. ( ४ )

रोगनिवृत्त करणाऱ्या व आरोग्य देणाऱ्या अशा उदक देवतांजवळ मी औषधींची याचना करतों. ( ५ )

कारण जलांत सर्व औषधें व जगदारोग्यकारक अग्नि आहे, असें सोमानें मला सांगितलें आहे. ( ६ )

हे उदकांनो ! माझ्या शरीरांत औषधांचा पुरवठा करा, म्हणजे मी निरोगी होऊन अनंतकाळ सूर्याला पाहूं शकेन व दीर्घायुषी होईन. ( ७ )

हे उदकांनो ! माझ्या ठिकाणीं जें किंचित् पाप असेल, मी जो कोणाचा द्रोह केला असेल अथवा जें कांहीं मी खोटें बोललों असेन किंवा शाप दिले असतील ते सर्व धुऊन टाका. ( ८ )

हे उदकांनो ! आज मीं तुमची उपासना केली व तुमच्याशीं संयुक्त झालों आहें. हे अग्ने, जलदेवतेसमवेत तूं मला तेजस्वी कर. ( ९ )

**अघमर्पणम्– ऋतंचेति तृचस्य माधुच्छंदसोऽघमर्पणो भाववृत्तिर्देवता । अनुष्टुप् अघमर्षणे विनियोगः ॥ ॐ ऋतं च सत्यं चाभींद्धात्तपसोऽध्यजायत । ततो रात्र्यजायत ततः समुद्रो अर्णवः ॥ १ ॥ समुद्रादर्णवादधि संवत्सरो अजायत । अहोरात्राणि विदधद्विश्वस्य मिषतो वशी ॥ २ ॥ सूर्याचंद्रमसौ धाता यथापूर्वम-कल्पयत् ॥ दिवं च पृथिवीं चांतरिक्षमथो स्वः ॥ ३ ॥ केशवाय नमः ॥ २४ ॥**

**अघमर्षण** शब्दाचा अर्थ उजव्या हातांत उदक घेऊन श्वासनिरोध करावा व उजव्या नाकपुडीनें श्वास पाण्यांत सोडून तें पाणी न पाहतां डाव्या बाजूस जमिनीवर टाकावें.

प्रकाशमान परमात्म्यापासून सत्य, त्याचप्रमाणें सर्व धर्म, रात्र, दिवस व समुद्र असे सर्व पदार्थ उत्पन्न झाले. ( १ )

जलमय सागर उत्पन्न झाल्यावर प्राणिमात्रांना नियंत्रित करणारा संवत्सरात्मक काळ उत्पन्न झाला. ( २ )

स्वर्ग, पृथ्वी, आकाश हीं त्रिभुवनें व चंद्रसूर्य हे जसे परमेश्वरानें पूर्वकल्पांत निर्माण केले तसेच तो पुढेंहि निर्माण करील. ( ३ )

आतां यापुढें आचमन करावें. ॐ केशवाय नमः ॐ नारायणाय नमः ॐ माधवाय नमः ॐ गोविन्दाय नमः । पहिल्या तीन नांवांनीं पाणी प्यावें, चवथ्या नांवानें पाणी सोडावें.

**अर्घ्यदानम्– गायत्र्या गाथिनो विश्वामित्रः सवितागायत्री अर्घ्यदाने विनियोगः ।। ॐभूर्भुवःस्वः तत्सवितु० प्रचोदयात् ।। इदं ब्रह्मावाप्तये प्रातःसंध्यांगभूतश्रीसूर्याय इदमर्घ्यं समर्पयामि । इति त्रिः । असावादित्यो ब्रह्म । केशवाय नमः ।। २४ ।। ( इति प्रदक्षिणं भ्रमन् जलं सिञ्चेत् । आचम्य प्राणायामत्रयं कृत्वा । )**

**अर्घ्यदान** म्हणजे ओंजळ भरून पाणी अर्पण करणें याला अर्घ्य असें म्हणतात. त्याची क्रिया पुढीलप्रमाणें—

दोन्ही हातांची अंजलि करून सूर्याकडे मुख करून उभें राहावें व प्रणवव्याहृति यांनीं युक्त गायत्री मंत्र म्हणून सूर्याला मी अर्घ्यें देतों असें म्हणावें व अंजलींतील उदक

ताम्हनांत सोडावें. अशीं एकूण तीन अर्घ्यें द्यावींत. अर्घ्यें देतांना अंगठा व तर्जनी ( म्हणजे अंगठ्याजवळील बोट ) हे अंजलीला लावूं नये. तीन अर्घ्यें दिल्यानंतर—

असौ आदित्यो ब्रह्म असें म्हणून आपल्या हातांत पाणी घ्यावें व आपल्याभोंवती गोल फिरत असतांना तें पाणी ज़मिनीवर सांडावें व हा सूर्यच ब्रह्म आहे अशी मनाची धारणा करावी.

**आसनम्– पृथ्वीतिमंत्रस्य मेरुपृष्ठऋषिः, कूर्मो देवता, सुतलं छंदः, आसने विनियोगः ॥ पृथ्वि त्वया धृता लोका देवि त्वं विष्णुना धृता ॥ त्वं च धारय मां देवि पवित्रं कुरु चासनम् ॥ १ ॥**

**ऊर्ध्वकेशि विरूपाक्षि मांसशोणितभोजने ॥ तिष्ठ देवि शिखाबंधे चामुंडे ह्यपराजिते ॥ १ ॥ अपक्रामंतु भूतानि पिशाचाः सर्वतो दिशम् । सर्वेषामविरोधेन ब्रह्मकर्म समारभे ॥ २ ॥ गायत्र्या विश्वामित्र ऋषिः । सविता देवता । गायत्री- छंदः । न्यासे विनियोगः ॥**

**आसनः**—हे भगवती पृथ्वी देवी, तूं त्रैलोक्याला धारण केलें आहेस. तूं मला धारण कर व माझें आसन पवित्र कर. ( १ )

तुझे केस उंच आहेत, तुझे नेत्र विरूप आहेत, तूं रक्त व मांस यांचे भोजन करणारी आहेस. हे चामुंडा देवी, तूं माझ्या शिखाबंधाच्या ठिकाणीं राहा. तुला कोणीहि पराजित करूं शकत नाहींत अशी तूं आहेस. भूतें व पिशाचें दशदिशांना जावोत. मी सर्वांच्या अनुकूलतेनें ब्रह्मकर्माला आरंभ करतों.

**न्यासः —ॐ तत्सवितुः अंगुष्ठाभ्यां नमः । हृदयाय नमः ।। वरेण्यं तर्जनीभ्यां नमः । शिरसे स्वाहा ।। भर्गो देवस्य मध्यमाभ्यां नमः । शिखायै वषट् ।। धीमहि अनामिकाभ्यां नमः कवचाय हुं ।। धियो यो नः कनिष्ठिकाभ्यां नमः । नेत्रत्रयाय वौषट् ।। प्रचोदयात् करतलकरपृष्ठाभ्यां नमः । अस्त्राय फट् ।। इति दिग्बंधः ।।**

**न्यासः** —शरीराच्या वेगवेगळ्या अवयवांत देवतांची भावना करून, त्या त्या अवयवांना मंत्रांनी स्पर्श करणें याला न्यास असें म्हणतात.

तत्सवितुः असें म्हणून उजव्या हातानें हृदयास स्पर्श करावा. वरेण्यम् असें म्हणून मस्तकाला हात लावावा. ॐ भर्गो देवस्य असें म्हणून शेंडीला स्पर्श करावा. धीमही असें म्हणून सर्व शरीराला कवच घातल्याची भावना करावी. धियो यो नः असें म्हणून दोन डोळे व भुवयीचा

मध्य यांना स्पर्श करावा. प्रचोदयात् असें म्हणून टाळी वाजवात्री व गायत्रीजपाकरितां सर्व दिशा शुद्ध केल्या आहेत अशी कल्पना करावी.

**ध्यानम्—यो देवः सविताऽस्माकं धियो धर्मादिगोचरे । प्रेरयेत्तस्य तद्भर्गस्तद्वरेण्यमुपास्महे ॥**

**ध्यान :—**जो भगवान् सूर्यनारायण आमची बुद्धी धर्माकडे प्रवृत्त करतो त्याच्या सर्वोत्तम तेजाची मी उपासना करतों.

**आगच्छ वरदे देवि जपे मे सन्निधौ भव । गायन्तं त्रायसे यस्मात् गायत्री त्वं ततः स्मृता । गायत्रीजपमहं करिष्ये ॥**

वरील मंत्र म्हणून उदक सोडावें व नंतर गायत्रीजप करावा.

**गायत्रीजपः—प्रणवस्य परब्रह्म परमात्मा गायत्री व्याहृतीनां प्रजापतिः प्रजापतिर्बृहती गायत्र्या विश्वामित्रः सविता गायत्री जपे विनियोगः ॥ ॐ भूर्भुवःस्वः तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि । धियो यो नः प्रचोदयात् ॥**

(असें म्हणून दश (१०), अष्टाविंशति (२८) किंवा अष्टोत्तरशत (१०८) जप करावा.)

**गायत्री जप :—** गायत्री जप १०८ वेळा, २८ वेळा किंवा निदान १० वेळा तरी करावा. गायत्रीजप झाल्यावर पुढीलप्रमाणें न्यास करावेत.

**न्यासः –ॐ तत्सवितुः हृदयाय नमः ॥ ॐ वरेण्यं शिरसे स्वाहा ॥ ॐ भर्गोदेवस्य शिखायै वषट् ॥ ॐ धीमहि कवचाय हुं ॥ ॐ धियो यो नः नेत्रत्रयाय वौषट् ॥ ॐ प्रचोदयात् अस्त्राय फट् ॥ इति दिग्बंधः ॥**

**न्यास :—** तत्सवितु असें म्हणून उजव्या हातानें हृदयास स्पर्श करावा. वरेण्यम् असें म्हणून शेंडीला स्पर्श करावा. धीमही असें म्हणून सर्व शरीराला कवच घातल्याची भावना करावी. धियो यो नः असें म्हणून दोन डोळे व भुवयींचा मध्य यांना स्पर्श करावा. प्रचोदयात् असें म्हणून टाळी वाजवावी व गायत्री जपाकरितां सर्व दिशा शुद्ध केलेल्या आहेत अशी कल्पना करावी.

**उपस्थानम्– जातवेदसे मारीचः कश्यपोऽग्निस्त्रिष्टुप् ॥ तच्छंयोः शंयुः विश्वेदेवाः शक्वरी, नमो ब्रह्मण इति ब्रह्मणस्पतिर्विश्वेदेवा जगती उपस्थाने विनियोगः ।**

ॐ जातवेदसे सुनवाम सोममरातीयतो नि दहाति वेदः । स नः पर्षदति दुर्गाणि विश्वा नावेव सिंधुं दुरितात्यग्निः ।। तच्छंयोरा वृणीमहे गातुं यज्ञाय गातुं यज्ञपतये दैवी स्वस्तिरस्तु नः स्वस्तिर्मानुषेभ्यः । ऊर्ध्वं जिगातु भेषजम् । शंनो अस्तु द्विपदे शं चतुष्पदे ।। नमो ब्रह्मणे नमो अस्त्वग्नये नमः पृथिव्यै नम ओषधीभ्यः । नमो वाचे नमो वाचस्पतये नमो विष्णवे महते करोमि ।।

**उपस्थान** या शब्दाचा अर्थ प्रार्थना असा आहे. जातवेदस नांवाच्या अग्नीसाठीं आम्ही सोम तयार करतों. तो अग्नि आमच्या शत्रूंचा नाश करो व कठीण अशा सर्व दुःखां-पासून आम्हांला मुक्त करो. ज्याप्रमाणें मोठमोठ्या नद्या नावेंत बसून तरून जातां येतात त्या-प्रमाणें आम्ही अग्नीच्या साहाय्यानें सर्व दुःखांतून तरूं.

यज्ञ व यज्ञपति यांची स्तुति करण्यासाठी आम्ही आरोग्याची याचना करतों. देवां-पासून आणि मनुष्यांपासून आमचें कल्याण असो. आमच्या घरांतील पुत्र आणि पशु या सर्वांचें कल्याण असो.

ब्रह्मदेव, अग्नि, पृथ्वी, औषधी, वाणी, बृहस्पति व सर्वान्तर्यामी यांना मी नमस्कार करतों.

**दिग्वंदनम्**— प्राच्यै दिशे इंद्राय नमः । आग्नेय्यै दिशे अग्नये नमः । दक्षिणायै दिशे यमाय नमः । नैर्ऋत्यै दिशे निर्ऋतये नमः । प्रतीच्यै दिशे वरुणाय नमः । वायव्यै दिशे वायवे नमः । उदीच्यै दिशे सोमाय नमः । ईशान्यै दिशे ईश्वराय नमः । ऊर्ध्वायै दिशे ब्रह्मणे नमः । अधरायै दिशे अनंताय नमः ।

**दिशावंदन**—पूर्व दिशेचा अधिपति जो इंद्र त्याला नमस्कार असो. आग्नेयाधिपति अग्नीला नमस्कार असो. दक्षिणाधिपति यमाला नमस्कार असो. नैर्ऋत्याधिपति निर्ऋतीला नमस्कार असो. पश्चिमाधिपति वरुणाला नमस्कार असो. वायव्येचा अधिपति जो वायु त्याला नमस्कार असो. उत्तर दिशेचा अपधिति जो सोम त्याला नमस्कार असो. ईशान्य दिशेचा अधिपति जो ईश्वर त्या ईश्वराला नमस्कार असो. ऊर्ध्व दिशेस ब्रह्मदेवाला व अधर दिशेस अनंताला नमस्कार असो.

**गायत्र्यै नमः । सावित्र्यै नमः । सरस्वत्यै नमः । संध्यायै नमः । सर्वाभ्यो देवताभ्यो नमः ॥ भ॒द्रं नो॒ अपिं वातय॒ मनः ॥ भारद्वाजसगोत्रोत्पन्नोऽहं अमुकशर्माहं भो अभिवादयामि ॥**

गायत्री, सावित्री, सरस्वती आणि संध्या देवता या सर्व देवतांस नमस्कार असो. आमच्या अंत:करणाला सत्कर्माची आवड द्या, अशी प्रार्थना करावी.

नंतर आपलें गोत्र उच्चारून संध्येंतील नांव उच्चारावें व गुरूंचें ध्यान करून नमस्कार करावा.

**आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरम् । सर्वदेवनमस्कारः केशवं प्रति गच्छति ॥ १ ॥ नमोऽस्त्वनंताय सहस्रमूर्तये सहस्रपादाक्षिशिरोरुबाहवे ॥ सहस्रनाम्ने पुरुषाय शाश्वते सहस्रकोटीयुगधारिणे नमः ॥ २ ॥ अनेन प्रातः-( वा सायं ) संध्यावंदनेन भगवान् श्रीपरमेश्वरः प्रीयताम् ॥ ॐ केशवाय नमः । नारायणाय नमः । इत्यादिना आचमनम् ॥**

आकाशांतून पडलेलें जल जसें समुद्रास जातें तसा सर्व देवतांना केलेला नमस्कार भगवान् श्रीकेशव देवास पोचतो. ( १ )

सहस्रकोटी युगानुयुगांचा काल धारण करणारा जो परमात्मा व ज्याला कधीं अंत नाहीं, ज्याच्या मूर्ति हजारों आहेत, ज्याला अनंत चरण, अनंत नेत्र, अनंत मस्तकें, अनंत मांड्या, अनंत हात असून ज्याचीं नांवें पण अनंत आहेत, असा जो शाश्वत पुरुष त्याला माझा नमस्कार असो. ( २ )

या केलेल्या संध्यावन्दनानें परमात्मा प्रसन्न होवो.

( येथें संध्येचा अर्थ पुरा झाला. )

# – अथ मध्याह्नसंध्या –

प्रात:संध्येप्रमाणेंच आचमन, प्राणायाम, मार्जन इत्यादि सर्व क्रिया करून खालील मंत्रानें संध्याचमन करावें.

**ॐ आपः पुनंतु पृथिवीं पृथिवीपूता पुनातु माम् ॥ पुनंतु ब्रह्मणस्पतिर्ब्रह्मपूता-पुनातु माम् ॥ यदुच्छिष्टमभोज्यं यद्वा दुश्चरितं मम ॥ सर्वं पुनंतु मामापो सतां च प्रतिग्रहꣳ स्वाहा ॥**

यानंतर द्वितीय मार्जन आणि अघमर्षण करून खालील मंत्रानें अर्घ्यदान करावें.

**ॐ हंसः शुचिषद्वसुरंतरिक्षसद्धोता वेदिषदातिथिर्दुरोणसत् ॥ नृषद्वरसदृतसद् व्योमसदब्जा गोजा ऋतजा अद्रिजा ऋतम् ॥**

उदुत्यंजातवेदसं० आदि तेरा ऋचांनीं उपस्थान करावें.

गायत्रीजपाच्या वेळीं युवतीं युवादित्य० या मंत्रानें गायत्रीचें ध्यान करावें.

हा मध्याह्नसंध्येचा विशेष आहे.

ॐउदुत्यं जातवेदसं देवं वहंति केतवः ॥ दृशे विश्वाय सूर्यं ॥ अपत्ये तायवो
यथा नक्षत्रायंत्यक्तुभिः ॥ सूराय विश्वचक्षसे ॥ अदृश्रमस्य केतवो वि रश्मयो जनाँ अनु ॥
भ्राजंतो अग्नयो यथा ॥ तरणिर्विश्वदर्शतो ज्योतिष्कृदसि सूर्य ॥ विश्वमा भासि रोचनं ॥
प्रत्यङ्देवानां विशः प्रत्यङ्ङुदेषि मानुषान् ॥ प्रत्यङ्विश्वं स्वर्दृशे ॥ १ ॥ येना पावक
चक्षसा भुरण्यंतं जनाँ अनु ॥ त्वं वरुण पश्यसि ॥ विद्यामेषि रजस्पृथ्वहा मिमानो
अक्तुभिः ॥ पश्यञ्जन्मानि सूर्य ॥ सप्त त्वा हरितो रथे वहंति देव सूर्य ॥ शोचिष्केशं
विचक्षण ॥ अयुक्त सप्त शुंध्युवः सूरो रथस्य नप्त्यः ॥ ताभिर्याति स्वयुक्तिभिः ॥
उद्वयं तमसस्परि ज्योतिष्पश्यंत उत्तरम् ॥ देवं देवत्रा सूर्यमगन्म ज्योतिरुत्तमम् ॥
उद्यन्नद्य मित्रमह आरोहन्नुत्तरां दिवम् ॥ हृद्रोगं मम सूर्य हरिमाणं च नाशय । शुकेषु मे
हरिमाणं रोपणाकासु दध्मसि ॥ अथो हारिद्रवेषु मे हरिमाणं निदध्मसि ॥ उदगाद-
यमादित्यो विश्वेन सहसा सह ॥ द्विषंतं मह्यं रंधयन्मो अहं द्विषते रधम् ॥ २ ॥ चित्रं देवाना-
मुदगादनीकं चक्षुर्मित्रस्य वरुणस्याग्नेः ॥ आप्रा द्यावापृथिवी अंतरिक्षं सूर्य आत्मा जगत-

स्स्तथुषश्च ॥ सूर्यो देवीमुषसं रोचमानां मर्यो न योषामभ्येति पश्चात् ॥ यत्रा नरो देवयंतो युगानि वितन्वते प्रति भद्राय भद्रम् ॥ भद्रा अश्वा हरितः सूर्यस्य चित्रा एतग्वा अनुमाद्यासः ॥ नमस्यंतो दिव आ पृष्ठमस्थुः परि द्यावापृथिवी यंति सद्यः ॥ तत्सूर्यस्य देवत्वं तन्महित्वं मध्या कर्तोर्विततं संजभार ॥ यदेदयुक्त हरितः सधस्थादाद्रात्री वासस्तनुते सिमस्मै ॥ तन्मित्रस्यवरुणस्याभिचक्षे सूर्यो रूपं कृणुते द्योरुपस्थे ॥ अनंतमन्यद्रुशदस्य पाजः कृष्णमन्यद्धरितः सं भरंति ॥ अद्या देवा उदिता सूर्यस्य निरंहसः पिपृता निरवद्यात् ॥ तन्नो मित्रो वरुणो मामहंतामदितिः सिंधुः पृथिवी उत द्यौः ॥ ३ ॥ इत्युपस्थाय उपविश्याचम्य प्राणायामं कृत्वा ॥ युवतीं युवादित्यमंडल-मध्यस्थां श्वेतवर्णां श्वेतांबरानुलेपनस्रगाभरणां चतुर्वक्त्रां प्रतिवक्त्रं त्रिनेत्रां चंद्रशेखरां त्रिशूलखड्गखट्वांगडमरुंकचतुर्भुजां वृषभासनारूढां रुद्रदैवत्यां यजुर्वेदमुदाहरंतीं भुवर्लोकाधिष्ठात्रीं गायत्रीं नाम देवतां ध्यात्वा संपूज्य यथाशक्ति जपं कुर्यात् ॥

॥ इति मध्याह्नसंध्या ॥

## — अथ सायंसंध्या —

सायंसंध्येंतही सर्व क्रिया प्रात:संध्येप्रमाणेंच करून मंत्राचमन खालीलप्रमाणें करावें.

ॐ अग्निश्च मामन्युश्च मन्युपतयश्च मन्युंकृतेभ्यः ।। पापेभ्यों रक्षंताम् ।। यद्ह्वा पापंमकार्षम् ।। मनसा वाचां हस्ताभ्याम् ।। पद्भ्यामुदरेंण शिश्ना ।। अहस्तदंवलुंपतु ।। यत्किंचं दुरितं मयिं ।। इदमहं माममृंतयोनौं ।। सत्ये ज्योतिषि जुहोंमि स्वाहा ।।

यानंतर प्रात:संध्येप्रमाणेंच सर्व क्रिया करून खालील मंत्रानें वरुणाचें उपस्थान करावें.

ॐ यच्चिद्धि ते विशो यथा प्रदेंव वरुण व्रतम् ।। मिनीमासि द्यविंद्यवि ।। मा नों वधायं हत्नवे जिहीळानस्यं रीरधः ।। मा हृणानस्यं मन्यवें ।। विमृंळीकायं ते मनों रथीरश्वं न संदितम् ।। गीर्भिर्वरुण सीमहि ।। परा हि मे विमंन्यवः पतंति वस्यंइष्टये ।। वयो न वंसतीरुपं ।। कदा क्षत्रश्रियं नरमावरुंणं करामहे ।। मृळीकायांरुचक्षसम् ।। १ ।। तदित् संमानमांशाते वेनंता न प्रयुंच्छतः ।। धृतव्रंताय दाशुषें ।। वेदा यो वीनां पदमंतरिंक्षेण

पतंताम् ॥ वेद नावः समुद्रियः ॥ वेद मासो धृतव्रतो द्वादश प्रजावतः ॥ वेदा य उप- जायंते ॥ वेद वातस्य वर्तनिमुरोर्ऋष्वस्य बृहतः ॥ वेदा ये अध्यासते ॥ निषसाद धृतव्रतो वरुणः पस्त्या ३ स्वा ॥ साम्राज्याय सुक्रतुः ॥

बाकी सर्व प्रात:संध्येप्रमाणें करावें.

॥ इति सायंसंध्या ॥

## चित्राहुति

सत्यं त्वर्तेन परिषिंचामि अंतश्चरति भूतेषु गुहायां विश्वमूर्तिषु ॥

जेवायला बसतेवेळीं परमात्म्याचें ध्यान करून उजव्या हातांत पाणी घ्यावें व आपल्या पानाभोंवतीं प्रदक्षणिक पाणी फिरवावें. ( डाव्या हाताकडून उजव्या हातापर्यंत फिरवावें ).

**ॐ चित्राय स्वाहा ॥ ॐ चित्रगुप्ताय स्वाहा ॥ ॐ यमाय स्वाहा ॥ ॐ यमधर्माय स्वाहा ॥**

वरील चार मंत्र म्हणतेवेळीं आपल्या पानाच्या उजव्या बाजूस जमिनीवर भाताच्या चार आहुंति घालाव्या व नंतर **अमृतोपस्तरणमसि स्वाहा** हा मंत्र म्हणून एक पळी भरून पाणी उजव्या हातावर घेऊन प्यावें.

**ॐ प्राणाय स्वाहा ॥ ॐ अपानाय स्वाहा ॥ ॐ व्यानाय स्वाहा ॥ ॐ उदायान स्वाहा ॥ ॐ समानाय स्वाहा ॥ ॐ ब्रह्मणे स्वाहा ॥**

वरील प्रत्येक मंत्र म्हणून झाल्यावर एक प्राणाहुति आपण भक्षण करावी. याप्रमाणें एकूण प्राणाहुति सहा आहेत. प्राणाहुति झाल्यावर डाव्या हातानें डोळ्याला पाणी लावावें. जेवून उठतेवेळीं **अमृतापिधानमासि स्वाहा** असा मंत्र म्हणून उजव्या हातानें एक पळीभर पाणी प्यावें व नंतर उठावें.

## ॥ अथ यज्ञोपवीतमंत्रः ॥

आचम्य प्राणानायम्य ॥ अद्यपूर्वोच्चरितएवंगुणविशेषणविशिष्टायां शुभपुण्यतिथौ मम आत्मनः श्रुतिस्मृतिपुराणोक्तफलप्राप्त्यर्थं श्रौतस्मार्तकर्मानुष्ठानसिद्ध्यर्थं यज्ञोपवीतधारणं करिष्ये ॥ तदंगम् अभिमंत्रणं करिष्ये ॥ ॐ तत्सवितुरिति त्रिगुणीकृत्य ॥ आपोहिष्ठेतित्र्यृचस्य आंबरीषः सिंधुद्वीप आपो गायत्री यज्ञोपवीतप्रोक्षणे विनियोगः ॥ ॐ आपोहिष्ठेतित्र्यृचैः प्रोक्षणं कुर्यात् ॥ पुनस्त्रिगुणं कुर्यात् ॥ ॐ हिरण्यवर्णाः शुचयः पावका यासु जातः कश्यपो यास्विंद्रः ॥ अग्निं या गर्भंदधिरे विरूपास्ता न आपः शꣳस्योना भवंतु ॥ यासाꣳ राजा वरुणो याति मध्ये सत्यानृते अवपश्यञ्जनानाम् ॥ मधुश्चुतः शुचयो याः पावकास्ता न आपः शꣳस्योना भवन्तु ॥ यासां देवा दिवि कृण्वंति भक्षं या अंतरिक्षे बहुधा भवंति ॥ याः पृथिवीं पयसोंदंति शुक्रास्ता न आपः शꣳस्योना भवंतु ॥ शिवेन मा चक्षुषा पश्यतापः शिवया तनुवोपस्पृशत त्वचं मे ॥ सर्वाꣳ अग्नीꣳरप्सुषदो हुवे वो मायि वर्चो बलमोजो नि धत्त ॥ पवमानः

शुचवर्जनः ॥ पवित्रेण विचर्षणिः ॥ यः पोता स पुनातु मा ॥ पुनंतु मा देवजनाः ॥
पुनंतु मनवो धिया ॥ पुनंतु विश्व आयवः ॥ जातवेदः पवित्रवत् ॥ पवित्रेण पुनाहि मा ॥
शुक्रेण देव दीद्यत् ॥ अग्ने क्रत्वा क्रतूँ॒रनु ॥ यत्ते पवित्रमर्चिषि ॥ अग्ने विततमंतरा ॥
ब्रह्मतेन पुनीमहे ॥ उभाभ्यां देवसवितः पवित्रेण सवेन च ॥ इदं ब्रह्म पुनीमहे। वैश्वदेवी-
पुनती देव्यागात् ॥ यस्यै बह्वीस्तनुवो वीतपृष्ठाः। तया मदंतः सधमाद्येषु ॥ वय॒ स्याम
पतयो रयीणाम् ॥ वैश्वानरो रश्मिभिर्मा पुनातु ॥ वातः प्राणेनेषिरो मयोभूः ॥
द्यावापृथिवी पयसापयोभिः ॥ ऋतावरी यज्ञिये मा पुनीताम् ॥ बृहद्भिः सवितस्तृभिः ॥
वर्षिष्ठैर्देव मन्मभिः अग्ने दक्षैः पुनाहि मा ॥ येन देवा अपुनत ॥ येनापो दिव्यं कशः ॥
तेन दिव्येन ब्रह्मणा ॥ इदं ब्रह्म पुनीमहे ॥ यः पावमानीरध्येति ॥ ऋषिभिः सभृत॒
रसम् ॥ सर्व॒ स पूतमश्नाति ॥ स्वादितं मातरिश्वना ॥ पावमानीर्यो अध्येति ॥
ऋषिभिः संभृत॒ रसम् ॥ तस्मै सरस्वती दुहे ॥ क्षीर॒ सर्पिमधूदकम् ॥ पावमानीः
स्वस्त्ययनीः सुदुघा हि पयस्वतीः ॥ ऋषिभिः संभृतो रसः ॥ ब्राह्मणेष्वमृत॒ हितम् ॥
पावमानीर्दिशंतु नः ॥ इमंलोकमथो अमुम् ॥ कामान्समर्धयंतु नः देवीर्देवैः समाभृताः ॥

पावमानीः स्वस्त्ययनीः ॥ सदुघा हि घृतश्चुतः । ऋषिभिः संभृतो रसः । ब्राह्मणेष्वमृत२ हितम् ॥ येन देवाः पवित्रेण ॥ आत्मानं पुनते सदा ॥ तेन सहस्रधारेण ॥ पावमान्यः पुनंतु माम् ॥ प्राजापत्यं पवित्रम् ॥ शतोद्याम२हिरण्मयम् । तेन ब्रह्मविदो वयम् ॥ पूतं ब्रह्म पुनीमहे ॥ इंद्रः सुनीतीसह मा पुनातु ॥ सोमः स्वस्त्या वरुणः समीच्या ॥ यमो राजा प्रमृणाभिः पुनातु मा ॥ जातवेदामोर्जयंत्या पुनातु ॥ ॐ भूरग्निं च पृथिवीं च मां च । त्रीं२श्चलोकान्संवत्सरं च ॥ प्रजापतिस्त्वासादयतु ॥ तया देवतयांगिर स्वद् ध्रुवासीद ॥ भुवो वायुं चांतरिक्षं च मां च ॥ त्रीं२० प्र० त० ॥ स्वरादित्यं च दिवं च मां च ॥ त्रीं२० प्र० त० ॥ भूर्भुवःस्वश्चंद्रमसं च दिशश्च मां च ॥ त्रीं२० प्र० त० ॥ ॐकारं प्रथमतंतौ न्यसामि ॥ अग्निं द्वितीयतंतौ० ॥ नागांस्तृतीयतंतौ० ॥ सोमं चतुर्थतंतौ । पितॄन्पंचमतंतौ० ॥ प्रजापतिं षष्ठतंतौ० ॥ वायुं सप्तमतंतौ० ॥ सूर्यं अष्टमतंतौ० ॥ विश्वान्देवान्नवमतंतौ न्यसामि ॥ उद्वयतमसस्परिज्योतिष्पश्यंत-उत्तरम् ॥ देवंदेवत्रासूर्यमगन्मज्योतिरुत्तमम् ॥ इति सूर्याय दर्शयित्वा ॥ ॐ स्योनापृथिवीभवानृक्षरानिवेशना ॥ यच्छानः शर्मसप्रथाः । इति भूमौ निधाय ॥

देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्याम् ॥ इति त्रिस्ताडयेत् । प्रतियज्ञोपवीतं दशगायत्रीर्जप्त्वा ॥ यज्ञोपवीतमित्यस्य परब्रह्मपरमात्मात्रिष्टुप् यज्ञोपवीतधारणे विनियोगः — ॐयज्ञोपवीतं परमं पवित्रं प्रजापतेर्यत्सहजं पुरस्तात् ॥ आयुष्यमग्र्यं प्रतिमुंच शुभ्रं यज्ञोपवीतं बलमस्तु तेजः । दक्षिणबाहुमुद्धृत्य यज्ञोपवीतं परिधाय आचामेत् ॥ जीर्णयज्ञोपवीतं विसृज्य द्विराचामेत् ॥ समुद्रं गच्छस्वाहा० इति मंत्रेण जले उद्वासयेत् । यथाशक्ति गायत्रीं जप्त्वा भगवते सूर्यनारायणाय जपं निवेद्य अनेन यज्ञोपवीतधारणाख्येन कर्मणा भगवान् परमेश्वरः प्रीयताम् ॥ इति यज्ञोपवीतमंत्रः समाप्तः ।



## ॥ अथ पुरुषसूक्तप्रारंभः ॥

श्रीगणेशाय नमः ॥ अथ पुरुषसूक्तम् ॥ सहस्रशीर्षा षोळशनारायणः पौरुषमानुष्टुभं त्रिष्टुबंतम् ॥ अभिषेके विनियोगः ॥ हरिः ॐ सहस्रशीर्षापुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् ॥ स भूमिं विश्वतो वृत्वा त्यतिष्ठद्दशांगुलम् ॥ पुरुष एवेदं सर्वं यद्भूतं यच्च भव्यम् ॥ उतामृतत्वस्येशानो यदन्नेनातिरोहति ॥ एतावानस्य महिमातो ज्यायांश्च पूरुषः ॥ पादोस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि ॥ त्रिपादूर्ध्वउदैत्पुरुषः पादोस्येहाभवत्पुनः ॥ ततो विष्वङ् व्यक्रामत्साशनानशने अभि ॥ तस्माद्विराळजायत विराजो अधि पूरुषः ॥ स जातो अत्यरिच्यत पश्चाद्भूमिमथो पुरः ॥ १ ॥ यत्पुरुषेण हविषा देवा यज्ञमतन्वत ॥ वसंतो अस्यासीदाज्यं ग्रीष्म इध्मः शरद्धविः ॥ तं यज्ञं बर्हिषि प्रौक्षन्पुरुषं जातमग्रतः ॥ तेन देवा अयजंत साध्या ऋषय श्चये । तस्माद्यज्ञात्सर्व-

हुतः संभृतं पृषदाज्यम् ॥ पशून्ताँश्चक्रे वायव्यानारण्यान् ग्राम्याश्च ये ॥ तस्माद्य-
ज्ञात्सर्वहुत ऋचः सामानि जज्ञिरे ॥ छंदांसि जज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत ॥
तस्मादश्वा अजायंत ये के चोभयादतः ॥ गावो ह जज्ञिरे तस्मात्तस्माज्जाता अजावयः
॥ २ ॥ यत्पुरुषं व्यदधुः कतिधा व्यकल्पयन् ॥ मुखंकिमस्य कौ बाहू का ऊरू पादा
उच्येते ॥ ब्राह्मणोस्य मुखमासीद्बाहू राजन्यः कृतः ॥ ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो
अजायत ॥ चंद्रमा मनसो जातश्चक्षोः सूर्यो अजायत ॥ मुखादिंद्रश्चाग्निश्च प्राणाद्वायुर-
जायत ॥ नाभ्यां आसीदंतरिक्षं शीर्ष्णो द्यौः समवर्तत ॥ पद्भ्यां भूमिर्दिशः श्रोत्रा-
त्तथा लोकाँ अकल्पयन् ॥ सप्तास्यासन्परिधयस्त्रिः सप्त समिधः कृताः ॥ देवा यद्यज्ञं
तन्वाना अबध्नन्पुरुषं पशुम् ॥ यज्ञेन यज्ञमयजंत देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ॥
तेह नाकं महिमानः सचंत यत्र पूर्वे साध्याः संति देवाः ॥ ३ ॥ अतो देवा इति षण्णां
काण्वोमेधातिथिर्देवाविष्णुर्गायत्री ॥ अभिषेके वि० ॥ ॐ अतो देवा अवंतु नो यतो
विष्णुर्विचक्रमे ॥ पृथिव्याः सप्त धामभिः ॥ इदं विष्णुर्वि चक्रमे त्रेधा नि दधे पदम् ॥

समूह्ळमस्य पांसुरे ।। त्रीणिं पदा वि चंक्रमे विष्णुर्गोपा अदाभ्यः ।। अतो धर्माणि धारयंन् ।।
विष्णोः कर्माणि पश्यत यतो व्रतानिं पस्पशे ।। इंद्रस्य युज्यः सखा ।। तद्विष्णोः परमं
पदं सदा पश्यंति सूरयः ।। दिवींव चक्षुराततम् ।। तद्विप्रासो विपन्यवो जागृवांसः
समिंधते ।। विष्णोर्यत्परमं पदम् ।। १ ।। इति पुरुषसूक्तं विष्णुसूक्तं च ।। देवस्य
त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्यामग्नेस्तेजसा सूर्यस्य वर्चसेंद्रस्येंद्रियेणा-
भिषिंचामि ।। बलाय श्रियै यशसेन्नाद्याय ।। अमृताभिषेकोऽस्तु । शांतिः पुष्टिस्तुष्टि-
श्चास्तु ।। ।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।



प्रकाशक— एस्. के. कौशिक, मे. चित्रलेखा एजन्सी, ७२४ बुधवार पेठ, पुणे २.

मुद्रक- बाळोबाम प्रेस, पुणे २.

